शैक्षणिक वर्ष २०१० -११
अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात
नवीन विद्याशाखांना मान्यता

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन आदेश क्रमांक एनजीसी २०१०/(२२७/१०)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ जुलै २०१०

**पहा**:- १) शासन निर्णय क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.१.२०१०, व दि. ३.४.२०१० (Task Force)
२) शासन पत्र क्रमांक-एनजीसी २०१० / (७/१०) / मशि-४,
दि.१५.३.२०१०, (Task Force)
३) संचालक, उच्च शिक्षण यांचे पत्र क्र. अमवि २०१०/कोवि/ प्रस्ताव १०-११/
अ.क.ड. / मवि २-३ / १७४० दिनांक १९.६.२०१०

## शासन आदेश

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८२(४) नुसार राज्यातील विद्यापीठांनी अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात विद्याशाखा मान्यतेसाठी प्रस्ताव शासनाकडे सादर करावयाचे असतात, त्यानुसार शैक्षणिक वर्ष २०१०-११ साठी राज्यातील विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांची अनुक्रमे शासन निर्णय व शासन पत्र क्रमांक-एनजीसी२०१०/ (७/१०) / मशि-४, दि. १५.१.२०१०, ३.४.२०१० व दि. १५.३.२०१० अन्वये स्थापित कृतिसमितीद्वारे छाननी करण्यात आली. कृती समितीचे अभिप्राय / शिफारशी व विद्यापीठाच्या शिफारशी विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) व ८३(५) अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमूद केल्यानुसार नवीन विद्याशाखांना खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून कायम विना अनुदान तत्वावर मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे / महाविद्यालयाचे नाव | मान्यता दिलेल्या विद्याशाखा |
|---|---|---|
| | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | सम्यक प्रबोधन संघाचे भिमराव टी प्रधान वरिष्ठ महाविद्यालय, मु.पा. बामणे, ता. शहापूर, जि. रायगड | बी.ए. |
| | **स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड** | |
| २. | ५०४/ श्री. साई कॉलेज ऑफ आय. टी., परभणी | एम.एस्सी. (सी.एम.) |
| ३. | विवेकानंद इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी ॲण्ड मॅनेजमेंट, बिसेन नगर,नांदेड | एम.जे. |
| | **राष्ट्रसंत तुकडोजी महाराज विद्यापीठ, नागपूर** | |
| ४. | राजे धर्मराव कला, वाणिज्य महाविद्यालय, अलापल्ली, ता.अहेरी, जि. गडचिरोली | विज्ञान |
| ५. | विवेकानंद महाविद्यालय, भद्रावती, ता. भद्रावती, जि. चंद्रपूर | बी.एस्सी. (आय.टी.) बी.सी.ए (विज्ञान) |
| | **संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती** | |
| ६. | श्रीमती तुलसीबाई रंगलालजी झांबड सिनियर कॉलेज, नांदूरा, जिल्हा बुलढाणा | बी.कॉम भाग १ (इंग्रजी माध्यम) |

**अटी व शर्ती:-**

I. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयाने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

II. संबंधित विभागीय सहसंचालकांचे हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठांने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

III. विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी, अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकानी ३० ऑगस्ट पर्यंत करावी व तद्नंतरच उपरोक्त अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

IV. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या युजीसी ( ॲफिलिएशन ऑफ कॉलेजेस बाय युनीव्हर्सीटीज) रेग्युलेशन, २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहीत केलेल्या निकषांची पुर्तता केल्याशिवाय संबंधित विद्याशाखांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

V. महाविद्यालयांने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

VI. नवीन विद्याशाखा मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयांनी सन २०१०-११ व २०११-१२ मध्ये NAAC ॲक्रीडीएशन प्राप्त करुन घ्यावे व ते या कालावधीत न मिळविल्यास सदर विद्याशाखा मान्यता आपोआप रद्द होईल.

VII. महाराष्ट्र विद्यापीठ कायदा १९९४ मधील कलम ८२ (५) व ८३(५) नुसार ही मान्यता शैक्षणिक वर्ष २०१०-११ साठी देण्यात येत आहे. ही मान्यता फक्त शैक्षणिक वर्ष २०१०-११ पूरतीच मर्यादित राहील. यावर्षी विद्याशाखा सुरु न केल्यास ही मान्यता आपोआप रद्द होईल.

३. विद्यापीठाचे संलग्निकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठांनी करण्यापूर्वी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

४. संबंधीत विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी विद्याशाखांबाबतचा नियतकालिक आढावा घेवून सदर विद्याशाखेसाठी मंजूर विद्यार्थी संख्येच्या ५० टक्के किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर विद्याशाखा रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत.

५. हे आदेश, राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००८०६२२४१४६००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि.गो.चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य,
४) संबंधित संस्था,
५) निवड नस्ती (मशि-४)